“गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे” या योजनेंतर्गत निधी वितरीत करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कृविका-२०१७/प्र.क्र.३२/भाग-१/३-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक- २९ मार्च, २०२५

**संदर्भ :**

१. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७/प्र.क्र.३२/भाग-१/३-अे, दि.५.१०.२०१८
२. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७/प्र.क्र.३२/भाग-१/३-अे, दि.९.९.२०१९
३. कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्रमांक : कृविका -२०१७/प्र.क्र.३२/भाग-१/३-अे, दि.२४.१२.२०२१
४. कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्रमांक : कृविका-२०१७/प्र.क्र.३२/भाग-१/३-अे, दि.१८.०५.२०२३
५. कृषि संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.कृआ/संचा. आत्मा/गटशेती/वि.प्र.५/३१९/२०२४, दि.०६.१२.२०२४
६. कृषि संचालक (आत्मा), कृषि आयुक्तालय,पुणे यांचे पत्र क्र. जा.क्र.कृआ/संचा. आत्मा/गटशेती/वि.प्र.५/४५/२०२४, दि.१३.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

सन २०२२ पर्यंत शेतकऱ्यांचे उत्पन्न दुप्पट करण्याच्या केंद्र शासनाच्या दृष्टीकोनास अनुसरुन पीक उत्पादन वाढविण्यासाठी निविष्ठा, प्रशिक्षण, सिंचन, यांत्रिकीकरण, काढणीपश्चात तंत्रज्ञान, कृषिमाल प्रक्रीया व पणन इत्यादी बाबी महत्वाच्या ठरतात. राज्यातील शेतकऱ्यांची जमीनधारणा कमी असल्याने शेतकऱ्यांच्या उत्पादनात भरीव वाढ होण्यासाठी सामुहिक शेती, शेती करण्याची आधुनिक पध्दती व काटेकोर नियोजनाची आवश्यकता ही बाब विचारात घेऊन “गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे” ही योजना राबविण्यास संदर्भाधीन दि. ०५.१०.२०१८ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयान्वये प्रस्तुत योजना सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये राबविण्यास मान्यता देण्यात आली होती.

"गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालना देणे" या योजनेस संदर्भाधीन दि.०९.०९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दोन वर्षाची मुदतवाढ (सन २०२०-२१ पर्यंत) देण्यात आली होती. तसेच दि. २४.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेस एक वर्षाची मुदतवाढ (सन २०२१-२२ पर्यंत) देण्यात आली होती. तसेच दि. १८.०५.२०२३

रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर योजनेस दोन वर्षाची मुदतवाढ दि.३१ मार्च, २०२४ पर्यंत (सन २०२२-२४ पर्यंत) देण्यात आली आहे.

त्यानुषंगाने आता कृषि संचालक (आत्मा) यांनी संदर्भाधीन दि.०६.१२.२०२४ व दि.१३.०३.२०२५ च्या पत्रांन्वये सदर योजनेकरिता सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड करण्यात आलेल्या कोल्हापूर, जिल्ह्यातील आनंदराव दादा ॲग्रो प्रोड्युार कंपनी, बेलेवाडी ता.कागल या गटाचे प्रलंबित दायित्व रू.७.५० लाख इतका निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे.

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालना देणे या योजनेकरिता रु.५.०० कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे.

त्यास अनुसरुन “गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालना देणे” या योजने अंतर्गत सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड करण्यात आलेल्या कोल्हापूर जिल्ह्यातील आनंदराव दादा ॲग्रो प्रोड्युार कंपनी, बेलेवाडी ता.कागल या गटाचे प्रलंबित दायित्व रू.७.५० लाख इतका निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

१. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये “गट शेतीस प्रोत्साहन व सबलीकरणासाठी शेतक-यांच्या गट शेतीस चालना देणे” या योजने अंतर्गत सन २०१७-१८ व सन २०१८-१९ मध्ये निवड करण्यात आलेल्या कोल्हापूर जिल्ह्यातील आनंदराव दादा ॲग्रो प्रोड्युार कंपनी, बेलेवाडी ता.कागल या गटाचे प्रलंबित दायित्व रू.७.५० लाख (अक्षरी रूपये सात लाख पन्नास हजार फक्त) एवढा निधी आयुक्त (कृषि) यांना वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी चालू वर्षी पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्र. डी-३
२४०१- पीक संवर्धन,
१०९ विस्तार व शेतकरी प्रशिक्षण ,
(०१)माहिती व प्रचार (०१) (५५) गट शेतीस प्रोत्साहन व
सबलीकरणासाठी शेतकऱ्यांच्या गट शेतीस चालना देणे (१००% राज्य योजना)
(२४०१ ए७८२) योजनांतर्गत ( दत्तमत )

३. सन २०२४-२५ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत होणारा निधी अखर्चित राहणार नाही याची दक्षता आयुक्त (कृषि) यांनी घ्यावी.

४. सदर योजनेअंतर्गत प्राप्त होणारा निधी खर्ची घालण्याकरिता आयुक्त (कृषि) यांना नियंत्रण अधिकारी तसेच सहायक संचालक , कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर योजनेअंतर्गत मानधनाच्या /खर्चाच्या रकमा DBT (Direct Benefit Transfer) द्वारे प्रदान करण्यात याव्यात.

५. निधी खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित अटी व शर्तीचे व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

६.	या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन दिलेल्या निधीचा तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच निधी विनियोगाच्या अनुषंगाने संचालक (आत्मा) यांनी वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

७.	सदरचा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. अनौ.सं.क्र.१६६ (का.१४३१) /दि.२१-३-२०२५ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४१/२०२५ /व्यय-१, दि.२८/०३/२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८.	सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२५०३२९१६५००२४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

AMOL NILAKANTH SAKHARKAR

Digitally signed by AMOL NILAKANTH SAKHARKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=36b60751d094e56d974e1a44ec234c475fb0de5b35a79c1cf69a588f212b260e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=BB4888CEBBF4B7A6440C6531A52925E3C8140B1C28DF723D8F006D11BC169A08, cn=AMOL NILAKANTH SAKHARKAR
Date: 2025.03.29 16:51:52 +05'30'

**( अ. नि. साखरकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. प्रधान सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त,कृषि,महाराष्ट्र राज्य,पुणे (५ जादा प्रतीसह)
५. महालेखापाल,महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता),मुंबई
६. महालेखापाल,महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता ),नागपूर
७. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
८. संचालक (आत्मा), तथा कृषि नोडल अधिकारी,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
९. सर्व संचालक / कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे
१०.सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी तथा प्रकल्प संचालक (आत्मा)द्वारा कृषि आयुक्तालय,पुणे.
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२.निवड नस्ती (का.३ अे).